(267)

~~२०१५०४२३१५२११०४४६२७~~

20150423152104462 7

केळूस डिमवाडी खारभूमी योजना ता.वेंगुर्ला, जि.सिंधुदुर्ग या योजनेस प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.खाभूयो २०१०/(०८/२०१०) खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ६/०१/२०११

पहावे : मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्र.३८०६/खाभू/केळूस /तां-२ (१)/८४१७, दिनांक ३१/१२/२००९

प्रस्तावना :-

केळूस डिमवाडी ता.वेंगुर्ला, जि.सिंधुदुर्ग खारभूमी योजना बृहत आराखडयात समाविष्ट आहे. केंद्रीय वन मंत्रालयाने किनारी नियमन अधिनियम १९९१ (CRZ) अन्वये या योजनेस सूट दिली आहे. या योजनेची एकूण लांबी १४८० मी. असून योजनेस दोन आयताकृती उघाडया प्रस्तावित आहेत. सदरची योजना समुद्राच्या जवळ आहे. त्यामुळे योजनेचे समुद्राच्या भरती, ओहोटी व उधाणामुळे ६२ हेक्टर क्षेत्र बाधित होत आहे. सदर योजनेचा प्रशासकीय मान्यता प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून प्राप्त झाला असून सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

या शासन निर्णयान्वये केळूस डिमवाडी खारभूमी योजना ता. वेंगुर्ला, जि.सिंधुदुर्ग या योजनेस खारभूमी दरसुची सन २००८-०९ या वर्षाच्या दरसूचीवर आधारित या योजनेस अंदाजित रु.८८,७०,९६८/- (रुपये अठ्याऐंशी लक्ष, सत्तर हजार, नऊशे अडुसष्ट फक्त) यापैकी रु.८०,६४,९९५/- कामाप्रित्यर्थ व रु.८,०५,९७३/- अनुषंगिक खर्च रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद खार जमीन योजना(१) बांधकामे (योजनांतर्गत)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र.एपीएच १०७३/३२६५३/ई(३),दि.१७.७.१९७४ मधील परिशिष्ट क्र.(३) व शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र.संकीर्ण १०९९/१२९/९९/मो प्र (प्र) विनियम

दि.१८.५.१९९९ मधील तरतूदीनुसार आतंर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता (०२/२०११) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( ज.प्र.जहागिरदार )
शासनाचे अवर सचिव

प्रतिलीपी अंदाजाच्या गोषवा-यावसह :-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, (दवप्र) व सहसचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (लघु पाटबंधारे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपअभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, सिंधुदूर्ग
अर्थशाखा १/२(२ प्रती) जलसंपदा विभाग,
खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २०१०/(८/२०१०) खारभूमी दिनांक ६/०१/२०११ चे सहपत्र
केळूस डिमवाडी खारभूमी योजना ता. वेंगुर्ला, जि.सिंधुदुर्ग, अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | एकूण रुपयात |
|---|---|---|
| १ | 'अ' प्राथमिक | ११४३० |
| २ | 'बी' भूसंपादन | ५२६४ |
| ३ | 'सी' मुख्य कामे | ६५०९६२५ |
| ४ | 'एफ' आर.एच.टी. वर्क्स | १५०३५५३ |
| ५ | 'के' इमारती | १००० |
| ६ | 'एम' वृक्षारोपण | १२०९० |
| ७ | 'ओ' संकीर्ण | २००० |
| ८ | 'पी' देखभाल | २००३३ |
| ९ | 'आर' दळणवळण | -- |
| | एकूण | ८०६४९९५ |
| | अनुषंगिक खर्च (भूसंपादन वगळून) | ८०५९७३ |
| | **एकूण** | ८८७०९६८ |

<u>ठळक वैशिष्टये</u>

| | |
|---|---|
| पुन:प्रापित क्षेत्र | ६२.०० हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | रु.१,४३,०८०/- |
| लाभव्यय गुणोत्तर | २.६७ |
| दरसूची वर्ष | २००८-२००९ |